९ R-२००४०७२११६२०२४००१-०३०७

देवस्थान इनाम जमिनी शिफारशी करण्यासाठी समितीची स्थापना करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय,क्रमांक डिईव्ही १०९६/४३/प्र.क्र.४३/ल-४
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १२/६/२००१

वाचा :- शासन निर्णय,महसूल व वन विभाग,क्रमांक डिईव्ही १०९६/४३/प्र.क्र.४३/ल-४,
दिनांक ३१.५.१९९६.

## शासन निर्णय

देवस्थान इनाम वर्ग ३ च्या जमिनी देवस्थानच्याच ताब्यात राहणे,देवस्थानाची देखभाल व्यवस्थीत होणे आणि देवस्थानाच्या जमिनीची विक्री इत्यादी व्यवहाराने ,हस्तांतरण न होणे यबाबत करावयाच्या उपाययोजना सुचविण्यासाठी शासन निर्णय,महसूल व वन विभाग,क्रमांक डिईव्ही १०९६/४३/प्र.क्र.४३/ल-४, दिनांक ३१.५.१९९६ अन्वये विभागीय आयुक्त,नाशिक यांच्या अध्यक्षतेखाली अभ्यासगटाची नियुक्ती करण्यात आली होती. या अभ्यासगटाने शासनास आपला अहवाल फेब्रुवारी,१९९७ मध्ये सादर केलेला आहे. त्याचप्रमाणे सदर अहवालाच्या अनुषंगाने,पश्चिम महाराष्ट्र देवस्थान समितीनेही काही सूचना केलेल्या आहेत. याच विषयासंदर्भात आश्वासन समितीकडे झालेल्या साक्षीच्या अनुषंगाने आश्वासन समितीनेही काही शिफारशी केलेल्या आहेत. त्याचबरोबर या विषयासंदर्भात विधीमंडळात झालेल्या चर्चेच्या वेळी देवस्थान इनाम अंबालिश करावयाचे असतील तर कुळकायदयाच्या संबंधित कलमांचा विचार करावा लागेल व त्यासाठी एक समिती नेमण्यात येईल असे शासनातर्फे आश्वासन देण्यात आलेले आहे. त्यानुषंगाने शासनाने यासंबंधात शिफारशी करण्यासाठी मा.राज्यमंत्री (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे समिती स्थापन करण्यचा निर्णय घेतलेला आहे :-

| | |
|---|---|
| १) मा.राज्यमंत्री (महसूल) | :- अध्यक्ष |
| २) धर्मादाय आयुक्त यांचे प्रतिनिधी | :- सदस्य |
| ३) कोणत्याही तीन देवस्थान समितीचे प्रतिनिधी | :- ३ सदस्य (प्रत्येकी एक याप्रमाणे) |
| ४) उपसचिव व नियंत्रण अधिकारी (ल-४ कार्यासन) | :- सदस्य |
| ५) उपआयुक्त (महसूल) पुणे विभाग,पुणे | :- सदस्य सचिव. |

२. उपरोक्त समितीने शिफारशी करतांना कुळ कायदयाच्या संबंधित कलमाबरोबरच पुढील बाबींही विचारात घ्यावयाच्या आहेत :-

१)विभागीय आयुक्त,नाशिक यांच्या अभ्यासगटाने सादर केलेला अहवाल.

२) आश्वासन समितीने केलेल्या शिफारशी.

३) पश्चिम महाराष्ट्र देवस्थान व्यवस्थापन समितीने केलेल्या शिफारशी.

३. समितीने सर्वसाधारणपणे तीन महिन्यात अहवाल सादर करण्याचे अपेक्षित आहे.

(कृ.मा.प.)

४. तरी उपरोक्त बाबी विचारात घेऊन शिफारशी करण्याबाबत समितीस विनंती करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ज.ना.पाटील

( ज.ना.पाटील )
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग.

प्रति :-

१) सर्व विभागीय आयुक्त.
२) सर्व जिल्हाधिकारी.
३) धर्मादाय आयुक्त,धर्मादाय भवन,वरळी,मुंबई.
४) उप सचिव (ल-४) कार्यासन ,महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
५) उप आयुक्त (महसूल), पुणे विभाग,पुणे.
६) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
७) निवडनस्ती ल-४ कार्यासन,महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.